**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA) यांची जिल्हा परिषद आस्थापनेवर ९६ पदे निर्माण केलेल्या पदांना ५ वर्षे मुदतवाढ देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्थाप २०१५/प्र.क्र.८८/मग्रारो-३**
नवीन प्रशासकीय इमारत, १६ वा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २८ ऑगस्ट, २०१७.

<u>वाचा :-</u>

१) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः मग्रारोहयो-२०१०/प्र.क्र.१२/रोहयो-१४, दि.११.११.२०१०**
२) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः आकृती-२०११/प्र.क्र.५/रोहयो-३, दि.३१.०५.२०११**
३) **शासन शुध्दीपत्रक नियोजन विभाग क्रमांकः आकृती-२०११/प्र.क्र.५/रोहयो-३, दि.२२.०६.२०११**
४) **शासन शुध्दीपत्रक नियोजन विभाग क्रमांकः आकृती-२०११/प्र.क्र.५/रोहयो-३, दि.२२.०६.२०११**
५) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः** आकृति-२०१०/प्र.क्र.७३/मग्रारो-३, दि.१५.०९.२०११
६) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः आस्थाप-२०१३/प्र.क्र.३/मग्रारो-३, दि.२४.०५.२०११**
७) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः आस्थाप-२०१३/प्र.क्र.२१/मग्रारो-३, दि.२०.०६.२०१३**
८) **शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः आस्थाप-२०१५/प्र.क्र.८८/मग्रारो-३, दि.२४.०७.२०१५**

<u>प्रस्तावना :-</u>

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कामात मोठया प्रमाणात वाढ झाल्यामुळे तालुका स्तरावर अंमलबजावणी करतांना क्षेत्रीय यंत्रणावरील कामाचा ताण सुदधा मोठया प्रमाणात वाढलेला आहे व दिवसेंदिवस योजनेचा विस्तार होत असल्याने ज्या तालुक्यामध्ये २ लक्षापेक्षा जास्त मनुष्यदिन निर्मिती झाली अशा तालुक्यांसाठी जिल्हा परिषद आस्थापनावरील कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता व कृषी अधिकारी (पंचायत समिती) संवर्गातून विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA) या पदनामाची ९६ पदे वाचा येथे नमूद अ.क्र.८ येथील दिनांक २४.०७.२०१५ च्या शासन निणर्यान्वये निर्माण करण्यात आलेली आहेत. सदरच्या पदांची मुदत दिनांक ३१.०७.२०१७ रोजी संपुष्टात येत आहे. त्यामुळे सन २०१६-१७ मध्ये ज्या तालुक्यात २ लक्षापेक्षा जास्त मनुष्यदिन निर्मिती झाली आहे अशा तालुक्यामध्ये या पदांची आवश्यकता असल्याने सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

<u>**शासन निर्णय :-**</u>

- म.गां.रा.ग्रा.रा.ह.यो अंतर्गत सन २०१६-१७ मध्ये त्या तालुक्यामध्ये २ लक्षापेक्षा जास्त मनुष्यदिन निर्माण झाले आहेत, त्या तालुक्यामध्ये विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA) यांच्या ९६ पदांना दिनांक ०१.०८.२०१७ पासून पुढील ५ वर्षाकरिता म्हणजेच दिनांक ३१.०७.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यास ग्रामविकास विभागाचने सहमती दर्शविल्याने मुदतवाढ देण्यात येत आहे.

- सदर आदेशान्वये सन २०१६-१७ मध्ये निर्माण झालेल्या २ लक्ष मुनष्यदिन निर्मातीच्या प्रमाणात तालुकानिहाय मुदतवाढ देण्यात आलेल्या **विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो** (Special Technical Officer-MGNREGA) {कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता व कृषी अधिकारी (पंचायत समिती)} या दोन्ही संवर्गातील पदांचे विवरण "प्रपत्र-अ" मध्ये दर्शविण्यात आली आहे.

- सदर पदे अस्थायी स्वरुपाची आहेत.

- नियुक्त करण्यात येणाऱ्या विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांचे वेतन नियमित कर्मचाऱ्यांप्रमाणेच मुख्यालय असलेल्या पंचायत समितीमार्फत (नियमानुसार सेवार्थ प्रणालीमधून) काढण्यात येईल. अशा कर्मचाऱ्यांच्या वेतनावर आर्थिक वर्षात झालेला एकूण खर्च आर्थिक वर्षाच्या शेवटी नरेगा सेल, जिल्हा परिषद मार्फत ६ टक्के प्रशासकीय खर्च निधीमधून मगांराग्रारोहयो- महाराष्ट्र, नागपूर आयुक्तालयाकडून संबंधित जिल्हा परिषदांना देण्यात येईल. त्यामुळे जिल्हा परिषदांनी सदर बाबींवर यापूर्वी केलेल्या खर्चाचे समायोजन होईल.

- जिल्हा परिषदेच्या नरेगा कक्षातील सहायक लेखाधिकारी, जिल्हा परिषदेच्या लेखा शाखेसोबत समायोजनाचे काम त्याच वित्तीय वर्षामध्ये पूर्ण करण्याची दक्षता घेतील.

- सोबत जोडलेल्या **"प्रपत्र-अ"** नुसार मंजूर करण्यात येत असलेली पदे सक्षम नियुक्ती अधिकारी यांनी प्रचलित सेवा प्रवेश नियमानुसार भरावी. ही पदे नियमित स्वरुपाची असल्याने ती केवळ प्रतिनियुक्तीने भरावयाची आहेत. कोणत्याही परिस्थितीमध्ये ही पदे कंत्राटी पद्धतीने भरण्यात येवू नयेत.

- एका विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो यांच्याकडे साधारणत: दोन तालुक्यांचा कार्यभार मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद तथा सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक यांच्या आदेशान्वये सोपविण्यात येईल. अपवादात्मक परिस्थितीत कमी किंवा जास्त तालुक्याचा कार्यभार सोपविण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक यांना राहतील.

- **"प्रपत्र-अ"** मध्ये नमूद केल्याप्रमाणे नियुक्त करण्यात येत असलेले विशेष तांत्रिक अधिकारी- मगांराग्रारोहयो हे कृषि आणि स्थापत्य अभियांत्रिकी या दोन प्रवर्गातील आहेत. त्यामुळे कृषि व स्थापत्य अभियांत्रिकी या दोन्ही प्रकारच्या सेवा **"प्रपत्र-अ"** मध्ये नमूद तालुक्यांना मिळणे अपेक्षित आहे. सदर बाबींचा विचार करुन दोन्ही संवर्गातील विशेष तांत्रिक अधिकारी- मगांराग्रारोहयो यांना योग्यप्रकारे कार्यक्षेत्र मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक निश्चित करुन द्यावे.

- सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये ज्या तालुक्यामध्ये २ लक्षापेक्षा जास्त मनुष्यदिन निमिर्ती झाली आहे अशा तालुक्यांसाठी जिल्हा परिषद आस्थापनावरील कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता व कृषी अधिकारी (पंचायत समिती) संवर्गातून विशेष तांत्रिक अधिकारी- मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA) यांची नियुक्ती करावयाची आहे. मागील वर्षी २ लक्षापेक्षा जास्त मुनष्यदिन निर्मिती झालेल्या, तथापि यावर्षी त्या तालुक्यामध्ये २

लक्षापेक्षा कमी मनुष्यदिन निर्मिती झाली असेल अशा तालुक्यातील उपरोक्त पदे २ लक्षापेक्षा जास्त मनुष्यदिन निर्मिती झालेल्या तालुक्यात उपलब्ध करुन द्यावयाची आहेत. वरीलप्रमाणे पुढील ५ वर्षांपर्यंत २ लक्षापेक्षा कमी मनुष्यदिन निर्मिती तालुक्यातून २ लक्षापेक्षा जास्त मनुष्यदिन निर्मीती झालेल्या तालुक्यात उपलब्ध करुन द्यावयाची कार्यवाही अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक यांनी करावी व याबाबत आयुक्त, मंग्राराग्रारोहयो, नागपूर यांना दरवर्षी अवगत करतील.

- यापूर्वी दिनांक २४.०७.२०१५ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती सदर शासन निर्णयास लागू राहतील.

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. या आदेशान्वये मुदतवाढ देण्यात आलेल्या विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA) या पदावरील कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता व कृषी अधिकारी (पंचायत समिती) या संवर्गातील कर्मचारी / अधिकारी यांच्या नियुक्त्या ग्रामविकास विभाग / संबंधित विभाग प्रमुखांनी तात्काळ कराव्यात.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२९१२०६३७०११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Dr. Pramod Sopan Shinde

Digitally signed by Dr. Pramod Sopan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=86df3b89584863ae114ab9dcc19318acf0e1e94714d4f3f2196a35403313b298, cn=Dr. Pramod Sopan Shinde
Date: 2017.08.28 17:11:53 +05'30'

**(डॉ. प्रमोद शिंदे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
५. प्रधान सचिव (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८. सचिव (वि.सु.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर व उपनगर वगळून)
११. सर्व उप आयुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालय.
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१३. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो), जिल्हाधिकारी कार्यालय (मुंबई शहर व उपनगर वगळून).

१४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१५. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१८. सर्व उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी (रोहयो प्रभाग), मंत्रालय, मुंबई - ३२.
१९. सारसंग्रहासाठी, मग्रारो-१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप २०१५/प्र.क्र.८८/मग्रारो-३, दिनांक २८ ऑगस्ट, २०१७ सोबतचे**

**<u>प्रपत्र -ब</u>**

**विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो (Special Technical Officer-MGNREGA) यांचा सन २०१५-१६ या वर्षासाठी, महसूली विभागनिहाय, जिल्हानिहाय व तालुकानिहाय निर्माण करावयाच्या पदांचा तपशील**

| अ. क्र. | महसूली विभाग | जिल्हा | विशेष तांत्रिक अधिकारी-मगांराग्रारोहयो चे पद मंजूर असलेले तालुके | निर्माण करावयाच्या पदांची संख्या | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता संवर्ग | कृषि अधिकारी संवर्ग | एकूण पदे |
| १ | कोकण | पालघर | जव्हार, विक्रमगड, वाडा, मोखाडा | २ | २ | ४ |
| २ | नाशिक | नाशिक | पेठ, येवला | १ | १ | २ |
| ३ | | धुळे | साक्री, धुळे, सिंदखेडा, शिरपूर | २ | २ | ४ |
| ४ | | नंदूरबार | अक्राणी, शहादा, अक्कलकुवा, नंदूरबार, नवापूर | ३ | २ | ५ |
| ५ | ** | जळगाव | चाळीसगाव, एरंडोल, जामनेर, पारोळा, मुक्ताईनगर, | २ | २ | ४ |
| ६ | | अहमदनगर | कर्जत, अहमदनगर, पारनेर, शेवगांव | २ | २ | ४ |
| ७ | पुणे | सांगली | जत | १ | ० | १ |
| ८ | औरंगाबाद | औरंगाबाद | गंगापूर | १ | ० | १ |
| ९ | | जालना | धनसावंगी, परतूर, अंबड | २ | १ | ३ |
| १० | | परभणी | गंगाखेड, सेलू | १ | १ | २ |
| ११ | | हिंगोली | हिंगोली | १ | ० | १ |
| १२ | ** | बीड | बीड, केज, गेवराई, पाटोदा, अंबेजोगाई, परळी | ३ | २ | ५ |
| १३ | | नांदेड | माहूर | १ | ० | १ |
| १४ | ** | उस्मानाबाद | परांडा , कळंब | १ | ० | १ |
| १५ | ** | लातूर | रेणापूर, औसा, अहमदपूर, लातूर, उदगीर | २ | २ | ४ |
| १६ | अमरावती | अमरावती | चिखलदरा,धारणी, मोर्शी, वरुड, अचलपूर, चांदूर बाजार, दर्यापूर | ४ | ३ | ७ |
| १७ | | अकोला | पातूर | १ | ० | १ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १८ | | वाशिम | रिसोड, मानोरा, मंगरुळपीर, वाशिम | २ | २ | ४ |
| १९ | ** | बुलडाणा | मेहकर, लोणार, मोताळा | २ | १ | ३ |
| २० | ** | यवतमाळ | यवतमाळ, केळापूर, उमरखेड, घाटंजी, आर्णी, राळेगाव | ३ | २ | ५ |
| २१ | नागपूर ** | नागपूर | रामटेक, नरखेड, काटोल, मौदा, उमरेड, कुही, भिवापूर, | ३ | २ | ५ |
| २२ | | वर्धा | कारंजा | १ | ० | १ |
| २३ | | भंडारा | मोहाडी, तुमसर, लाखनी, साकोली, लाखांदूर, भंडारा, पवनी, | ४ | ३ | ७ |
| २४ | | गोंदिया | देवरी, अर्जुनी मोरगाव, गोंदिया, तिरोडा, सालेकसा, आमगाव, गोरेगाव, सडक अर्जुनी | ४ | ४ | ८ |
| २५ | | चंद्रपूर | ब्रम्हपुरी, नागभीड, मूल, सिंदेवाही, सावली, चिमूर, पोंभुर्णा | ४ | ३ | ७ |
| २६ | ** | गडचिरोली | चामोर्शी, धानोरा, कुरखेडा, आरमोरी, गडचिरोली, देसाईगंज, कोरची, मूलचेरा | ३ | ३ | ६ |
| **एकूण** | | | | **५६** | **४०** | **९६** |

**** उक्त जिल्हयांच्या नावासमोर दर्शविलेल्या तालुक्यांमध्ये आर्थिक वर्ष २०१६-१७ मध्ये २ लक्ष पेक्षा जास्त मनुष्य दिवस रोजगार निर्मिती झाली आहे. त्यापैकी संबंधित जिल्हयांसाठी मंजूर करण्यात आलेल्या पदांच्या संख्यांपैकी नेमक्या कोणत्या तालुक्यांमध्ये पद निर्माण करावयाचे आहे याचा निर्णय संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक यांनी आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र, नागपूर यांचेशी चर्चा करुन घ्यावा.**